जलसंपदा विभागांतर्गत महामंडळांच्या अनुदान संवितरण संनियंत्रणासाठी बीम्स प्रणालीवर आभासी स्वीय प्रपंजी लेखा (Virtual P.L.A.) अनिवार्य करणेबाबत....

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

### शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१९/प्र.क्र.९२/२०१९/कोषा-प्रशा ५

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख : १४ ऑगस्ट, २०२३

वाचा-: वित्त विभाग , शासन निर्णय समक्रमांक दि. २ मार्च, २०२१

**प्रस्तावना :**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये जलसंपदा विभागांतर्गत महामंडळांच्या अनुदान संवितरण संनियंत्रणासाठी BEAMS प्रणालीवर आभासी स्वीय प्रपंजी लेखा (Virtual-PLA) निर्माण करणेबाबत आणि कार्यपद्धतीबाबत सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

२. संदर्भाधीन शासन निर्णयातील मुद्दा क्र. ३) नुसार **"आभासी स्वीय प्रपंजी लेखा प्रणालीचा वापर दि.०१ एप्रिल, २०२१ पासून महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे येथे पथदर्शी स्वरुपात अंमलात येईल. तदनंतर दि.०१ ऑगस्ट, २०२१ पासून जलसंपदा विभागांतर्गत असलेल्या सर्व पाटबंधारे महामंडळात प्रायोगिक तत्वावर सदर कार्यप्रणाली वापरली जाईल. दि.०१ एप्रिल, २०२२ पासून पुढे जलसंपदा विभागांतर्गत कार्यरत सर्व पाटबंधारे महामंडळांना व त्यांचे अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना बांधकाम, पुर्नवसन व भूसंपादन यासाठी राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या भांडवली अनुदानाचा विनियोग आभासी स्वीय प्रपंजी लेखा कार्यप्रणालीद्वारेच करणे अनिवार्य राहील"** असा निर्णय घेण्यात आला होता.

३. तथापि अद्यापही (१) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे; (२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजी नगर; (३) तापी खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव आणि (४) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर या उर्वरित पाटबंधारे विकास महामंडळांकडून Virtual - PLA कार्यपद्धती राबविण्यात येत नसल्याचे निदर्शनास आले आहे. सदर पाटबंधारे विकास महामंडळांकडून गतवर्षी वितरीत करण्यात आलेले अखर्चित अनुदान पुढील वर्षात वापरण्यास मान्यता देण्याबाबतचे प्रस्ताव तसेच एका महामंडळाकडून दुसऱ्या महामंडळाकडे निधी वर्ग करावयाचा झाल्यास धनादेश वापरण्याच्या मागणीचे प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेस्तव वारंवार प्राप्त होत असतात.

या पार्श्वभूमीवर उक्त परिच्छेद ३ मध्ये नमूद ४ पाटबंधारे विकास महामंडळांनी व त्यांचे अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना बांधकाम, पुर्नवसन व भूसंपादन यासाठी राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या भांडवली अनुदानाचा विनियोग आभासी स्वीय प्रपंजी लेखा कार्यप्रणालीची प्रत्यक्ष अंमलबजावणी प्राधान्याने सत्वर सुरु करण्याबाबत अंतिम निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

(१) जलसंपदा विभागांतर्गत कार्यरत (१) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे; (२)गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, छत्रपती संभाजी नगर; (३) तापी खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव आणि (४) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर येथे आभासी स्वीय प्रपंजी लेखा प्रणालीचा वापर दि.१ सप्टेंबर, २०२३ पासून पथदर्शी स्वरुपात प्रायोगिक तत्वावर अंमलात येईल. तदनंतर दि. १ एप्रिल, २०२४ पासून या पाटबंधारे विकास महामंडळांना व त्यांचे अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना बांधकाम, पुनर्वसन व भूसंपादन यासाठी राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या भांडवली अनुदानाचा विनियोग आभासी स्वीय प्रपंजी लेखा कार्यप्रणालीद्वारेच करणे अनिवार्य राहील.

(२) आभासी स्वीय प्रपंजी लेखा कार्यप्रणालीची अंमलबजावणी करण्यासंदर्भात संदर्भाधीन शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या सर्व सूचना आहेत तशाच लागू रहातील. त्याचप्रमाणे आभासी स्वीय प्रपंजी लेखा प्रणालीच्या अंमलबजावणीसाठी संदर्भाधीन शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट (अ) मध्ये देण्यात आलेल्या कार्यपध्दतीचाच अवलंब करणे अनिवार्य राहील.

(३) जलसंपदा विभागाच्या अधिनस्त महामंडळांतर्गत प्रायोगिक तत्वावर आभासी स्वीय प्रपंजी लेखा कार्यप्रणाली दि.१ सप्टेंबर, २०२३ पासून सुरु झाल्यानंतर धनादेशाचा वापर टप्प्याटप्प्याने कमी करण्यात येणार आहे. दि. १ एप्रिल २०२४ पासून आभसी स्वीय प्रपंजी लेखा कार्यप्रणालीचा वापर शतप्रतिशत करावयाचा असल्याने धनादेशाचा वापर पूर्णपणे बंद करावयाचा आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२३०८१४१३१४३९७८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Uttamrao Gadekar

Digitally signed by Rajendra Uttamrao Gadekar
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b8e8c3a034acb70f16af6f81c69ca038ff6f25ff78cfc9e6d815fd95b5367b07, postalCode=422009, street=Infront of Guru Govind Sing polytechnic Pathardi road,Nashik,Cidco Colony,Nashik,Nashik, pseudonym=a51e3d1ac32115d0d5c8203f904c1741, title=7921, serialNumber=37a42e182bace4c129abbeb54e27836d32d401560638f644a547867205474ee5, o=Personal, cn=Rajendra Uttamrao Gadekar
Date: 2023.08.14 13:16:41 +05'30'

**(डॉ.राजेंद्र गाडेकर)**
**शासनाचे उप सचिव,**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- 1, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई 400002
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन*, नागपूर 444001
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२. सर्व विभागीय आयुक्त
२३. सर्व जिल्हाधिकारी
२४. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/ नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर
२८. संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा संचालनालय, नवी मुंबई
२९. सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई / पुणे/ नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर
३०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३१. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३२. निवड नस्ती कोषा प्र.5